कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रम रत्नागिरी जिल्हयाच्या प्रकल्प प्रस्तावातील कामांना सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत .

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः कोवियो- २०१७ /प्र.क्र.१६६ (६) /योजना-६**

**बांधकाम भवन, ७ वा मजला, २५, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई - ४०० ००१**

**तारीख: ४ ऑगस्ट, २०१७**

वाचा -

1) **शासन निर्णय क्रमांकः ग्रामविकास विभाग, क्र. कोवियो-२०१५/ प्र. क्र. ७५/ योजना ९, दि. २३.११.२०१५**
2) **शासन निर्णय क्रमांकः ग्रामविकास विभाग. क्र. कोवियो-२०१६/ प्र. क्र. ९६/ योजना ९, दि. ११.०४.२०१६**

प्रस्तावना -

कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रमांतर्गत संदर्भीय दि.२३.११.२०१५ च्या शासन निर्णयास अनुसरुन जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांनी राज्य स्तरीय समिती, कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रम यांच्या मान्यतेसाठी सादर केलेल्या प्रस्तावाला, संदर्भ क्र.२ येथील दि.११.०४.२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. आता, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांच्या कार्यालयाच्या क्र.रजिप/साप्रवि/ग्रापं./ कार्या-१०/२३०६/२०१, दि.२४.०५.२०१७ व क्र.रजिप / साप्रवि/ ग्रापं. / कार्या-१० / २९५३/ २०१७, दि.१०.०७.२०१७ च्या पत्रान्वये, कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रमातंर्गत रत्नागिरी जिल्हयातील प्रशासकीय मान्यता मिळालेल्या कामांपैकी काही कामांच्या नावांत बदल करण्याबाबतच्या व काही कामे रद्द करण्याबाबतच्या सुधारीत प्रशासकीय मान्यतेसाठी सादर केलेल्या प्रस्तावाला मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रमातंर्गत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांच्या कार्यालयाने दि.२४.०५.२०१७ व दि.१०.०७.२०१७ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन, यापूर्वी संदर्भीय दि.११.०४.२०१६ च्या शासन निर्णयान्वये रत्नागिरी जिल्हयातील प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या कामांपैकी अनुक्रमे परिशिष्ट क्र.१ मध्ये नमूद केलेल्या कामांच्या तपशीलांत बदल करुन, सदर परिशिष्टातील रकाना क्र. ५ मध्ये नमूद केलेल्या कामांना सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. तसेच उपरोक्त दि.११.०४.२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली परिशिष्ट क्र. २ मधील कामे या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत आहेत. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांनी सोबतच्या परिशिष्ट क्र.१ मधील सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या कामांवर येणारा खर्च ग्राम विकास विभाग,

शासन निर्णय क्र. कोवियो-२०१६/प्र.क्र.४६६/योजना-९, दि.१८.०२.२०१६ अन्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

२. ही मंजुरी वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/विनियम, दि.१५.०५.२००९ अन्वये प्रसिध्द केलेल्या वित्तिय अधिकार नियम पुस्तिका भाग- पहिला, उप-विभाग-तीन मधील अनुक्रमांक ४ येथील परिच्छेद क्र. २७ (२) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारास अनुसरुन देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८०४१५३९३७७१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manoj D Jadhav

Digitally signed by Manoj D Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a83fc829949e9b1a022b031436c946028b48d51f5a1bf36ca3ce4fead857da72, cn=Manoj D Jadhav
Date: 2017.08.05 15:59:54 +05'30'

**( मनोज जाधव )**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद/विधानसभा, मुंबई.
२. प्रधान सचिव, पर्यटन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
४. मुख्य वास्तुविशारद, सा.बां.वि., बांधकाम भवन, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
८. जिल्हाधिकारी, रत्नागिरी.
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी.
१०.उप सचिव, पर्यटन, मंत्रालय, मुंबई.
११.अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी.
१२.मा.मंत्री, ग्राम विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१३.मा. राज्यमंत्री, ग्राम विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१४.कार्यकारी अभियंता, जि.प.बांधकाम, रत्नागिरी.
१५.जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी.
१६.निवड नस्ती, कार्यासन योजना-६, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.

परिशिष्ट - १

(ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्र.कोवियो-२०१७/प्र.क्र.१६६ (६) /योजना-६,
दिनांक : ४ ऑगस्ट, २०१७ चे सहपत्र)

कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रमांतर्गत

सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या रत्नागिरी जिल्हयातील कामांची यादी.

| अ. क्र. | तालुका | ग्रामपंचायतीचे व पर्यटन स्थळाचे नाव | दि.११.०४.२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या कामांचे नाव | सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या कामांचे नाव | काम संख्या (नग) | रक्कम (लाखात) |
|---|---|---|---|---|---|---|
| | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १. | मंडणगड | वेळास- वेळास समुद्रकिनारा | स्वागत कक्ष उभारणे | गजिबो टेंट | ३ | रु.१२.०० |
| २. | दापोली | लाडघर- समुद्रकिनारा | स्वागत कक्ष उभारणे | गजिबो टेंट | ३ | रु. १२.०० |
| | | कर्दे- समुद्रकिनारा | स्वागत कक्ष उभारणे | गजिबो टेंट | ३ | रु. १२.०० |
| ३. | गुहागर | वेळणेश्वर - वेळणेश्वर समुद्रकिनारा | स्वागत कक्ष उभारणे | गजिबो टेंट | ३ | रु.१२.०० |
| | | | रस्ते/स्थळ दर्शविणारे फलक लावणे. | सेलम स्टील रेलिंग करणे | १५५ मी. | रु.९.७३ |
| ४. | रत्नागिरी जिल्हा | रत्नागिरी जिल्हयातील ग्रामीण भागातील महनीय व्यक्ती | पर्यटनदृष्टया उपयुक्त असणाऱ्या गावांच्या समुहाची तेथील सोयी सुविधांची व पर्यटन विषयक स्थळांची माहिति देण्यासाठी एखादी सामाईक यंत्रणा उभारणे | कला,क्रिडा, सांस्कृतिक राजकीय क्षेत्रातील महनीय व्यक्तींचे माहितीदर्शक फलक | २० | रु.१.०० |
| ५. | रत्नागिरी | गणेशगुळे समुद्रकिनारा | प्रसाधन गृह व स्वच्छता गृह बांधणे | कचरा पेटी एकूण ८ सागर किनाऱ्यांकरिता | ८ | .०.८० |
| | | | स्वागत कक्ष उभारणे | गजिबो टेंट | ३ | रु.१२.०० |
| | | | | | एकूण | रु.७१.५३ |

## परिशिष्ट - २

(ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्र.कोवियो-२०१७/प्र.क्र.१६६ (६) /योजना-६,
दिनांक : ४ ऑगस्ट, २०१७ चे सहपत्र)

**कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रमांतर्गत प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली रत्नागिरी जिल्हयातील रद्द करावयाच्या कामांची यादी.**

| अ.क्र. | तालुका | ग्रामपंचायतीचे नाव | कामाचे नाव | एकूण अंदाजित रक्कम लाखात |
|---|---|---|---|---|
| १ | मंडणगड | बाणकोट | वाय फाय सुविधा पुरविणे | रु.०.०१ |
| २ | | वेळास | वाय फाय सुविधा पुरविणे | रु.०.०१ |
| ३ | दापोली | लाडघर | वाय फाय सुविधा पुरविणे | रु.०.०१ |
| ४ | | कर्दे | वाय फाय सुविधा पुरविणे | रु.०.०१ |
| ५ | गुहागर | वेळणेश्वर | वाय फाय सुविधा पुरविणे | रु.०.०१ |
| ६ | | | प्रसाधनगृह व स्वच्छतागृह बांधणे | रु.१०.०० |
| ७ | | | स्वागत कक्ष उभारणे | रु.१५.०० |
| ८ | रत्नागिरी | गणेशगुळे | वाय फाय सुविधा पुरविणे | रु.०.०१ |
| ९ | | उक्षी | १) रस्ते /स्थळ दर्शविणारे फलक लावणे.<br>२) पर्यटनदृष्टया उपयुक्त असणाऱ्या गावांच्या समुहांची तेथील सोई सुविधांची व पर्यटनविषयक स्थळांची पर्यटकांना माहिती देण्यासाठी एखादी सामाईक यंत्रणा उभारणे. | रु.०.९० |
| १० | राजापूर | भालावली | १) रस्ते/ स्थळ दर्शविणारे फलक लावणे.<br>२) पर्यटनदृष्टया उपयुक्त असणाऱ्या गावांच्या समुहांची तेथील सोई सुविधांची व पर्यटनविषयक स्थळांची पर्यटकांना माहिती देण्यासाठी एखादी सामाईक यंत्रणा उभारणे.<br>३) गावांतर्गत पर्यटन स्थळापर्यंत पोच रस्ते बांधणे.<br>४) गावांतर्गत पर्यटन स्थळापर्यंत पोच रस्ते बांधणे.<br>५) सौरदिवे बसविणे. | रु.५.४० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ११ | | देविहसोळ | १) रस्ते/ स्थळ दर्शविणारे फलक लावणे.<br>२) पर्यटनदृष्टया उपयुक्त असणाऱ्या गावांच्या समुहांची तेथील सोई सुविधांची व पर्यटनविषयक स्थळांची पर्यटकांना माहिती देण्यासाठी एखादी सामाईक यंत्रणा उभारणे.<br>३) गावांतर्गत पर्यटन स्थळापर्यंत पोच रस्ते बांधणे.<br>४) गावांतर्गत पर्यटन स्थळापर्यंत पोच रस्ते बांधणे. | रु.४.१० |
| १२ | | साखर | १) रस्ते/ स्थळ दर्शविणारे फलक लावणे.<br>२) पर्यटनदृष्टया उपयुक्त असणाऱ्या गावांच्या समुहांची तेथील सोई सुविधांची व पर्यटनविषयक स्थळांची पर्यटकांना माहिती देण्यासाठी एखादी सामाईक यंत्रणा उभारणे. | रु.०.४० |
| १३ | | वाडापेठ | १) रस्ते/ स्थळ दर्शविणारे फलक लावणे.<br>२) पर्यटनदृष्टया उपयुक्त असणाऱ्या गावांच्या समुहांची तेथील सोई सुविधांची व पर्यटनविषयक स्थळांची पर्यटकांना माहिती देण्यासाठी एखादी सामाईक यंत्रणा उभारणे. | रु.०.४० |
| १४ | | गोवळ | १) रस्ते/ स्थळ दर्शविणारे फलक लावणे.<br>२) पर्यटनदृष्टया उपयुक्त असणाऱ्या गावांच्या समुहांची तेथील सोई सुविधांची व पर्यटनविषयक स्थळांची पर्यटकांना माहिती देण्यासाठी एखादी सामाईक यंत्रणा उभारणे. | रु.०.४० |
| १५ | लांजा | भडे | १) रस्ते/ स्थळ दर्शविणारे फलक लावणे.<br>२) पर्यटनदृष्टया उपयुक्त असणाऱ्या गावांच्या समुहांची तेथील सोई सुविधांची व पर्यटनविषयक स्थळांची पर्यटकांना माहिती देण्यासाठी एखादी सामाईक यंत्रणा उभारणे. | रु.०.४० |
| १६ | रत्नागिरी जिल्हा | | पर्यटनदृष्टया उपयुक्त असणाऱ्या गावांच्या समुहांची तथील सोई सुविधांची व पर्यटनविषयक स्थळांची पर्यटकांना माहिती देण्यासाठी एखादी सामाईक यंत्रणा उभारणे. | रु.६.८७ |
| | | | **एकूण** | **रु.४३.९३** |